

# मैत्रीण

**मैत्रिणीचं माझ्या काय काय सांगू ?**

ई साहित्य प्रकाशन
वर्ष : दूसरे , अंक : १९
दिनांक : २८.०६.२०१०

नेट अक्षरी

**या अंकात वाचा..**



संपादक -
स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सहसंपादक -
सोनाली घाटपांडे (पुणे)
भारती सरमळकर (मुंबई)
सचिन काकडे (मुंबई)

अतिथी संपादक –
प्रशांत दा. रेडकर (मुंबई)

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com

# माझ्या मैत्रिणी - - अतिथी संपादकाच्या लेखणीतून



नमस्कार दोस्तांनो,

आज नेटाक्षरीच्या माध्यमातून मी तुम्हा सर्वांशी छोटासा संवाद साधणार आहे.नेटाक्षरीचा प्रत्येक अंक हा एखाद्या विशिष्ट विषयाला वाहिलेला असतो.या वैशिष्ट्याला साजेसा विषय निवडायची जबाबदारी ह्यावेळी माझ्यावर आली आणि माझी फारच गडबड उडाली.बराच विचार केला पण विषय काही सुचेना.काय करावे म्हणता म्हणता पटकन काहीतरी आठवले आणि तिच आठवण मग विषय सुचवून गेली.रुसणाऱ्या,गाल फुगवून बसणाऱ्या,काळजी करणाऱ्या,आयुष्याच्या प्रवासात कुठल्यातरी वळणावर गर्दीत कायमच्या हरवून गेलेल्या काहींची नावे मनःपटलावर उमटली,मग जरा स्वतःशीच हसलो आणि विषय ठरला..

तो म्हणजे मैत्रीण.मैत्री..एका मुलाची आणि एका मुलीची.

मैत्री कधी,कुठे,कुणाशी होईल हे सांगणे तसे कठीणच,फक्त विचार जुळले की मैत्री होतेच,तीसुध्दा आपोआप.त्यासाठी वयाचे बंधन असतेच असे नाही.पण जर मैत्री एक मुलगा आणि एक मुलगी ह्यांची असेल तर मात्र जगाचे डोळे लगेच वटारतात,कान टवकारतात.त्यातच हिंदी चित्रपटांनी प्यार दोस्ती है,एक लडका और एक लडकी कभी दोस्त नहीं हो सकते अशा पध्दतीच्या फिल्मी संवादांचा मारा करुन आधीच वातावरणनिर्मिती केलेली असते.त्यामुळेच मुलामुलींची मैत्री असावी की नाही असे प्रश्न निर्माण होतात.

कोणतेही नाते म्हटले की त्यात मर्यादा ह्या आल्याच आणि ज्यांना या मर्यादांचे भान असते अशांचीच मैत्री यशस्वी होते.हाच निकष मुलामुलींच्या मैत्रीला लागू होतो.कारण मैत्रीची गाडी कधी प्रेमाचा रस्ता पकडेल हे सांगणे तसे कठीणच.त्यामुळे मर्यादांची सीमारेषा कितपत पाळायची हा शेवटी ज्याचा त्याचा प्रश्न आहे.पण एक मात्र नक्की,एक चांगला मित्र आणि मैत्रीण जर योग्य विचाराअंती आयुष्याचा जोडीदार होण्याचा निर्णय घेत असतील तर याहून अधिक चांगले काय असेल ?

आयुष्याच्या प्रत्येक वळणावर आपल्याला एक मैत्रीण भेटलेली असते,फक्त आपले त्याकडे लक्ष नसते.आपण लहान असतांना आपली काळजी घेणारी,आपल्या आनंदामध्ये सहभागी होणारी,आपल्या दुःखात मायेची फुंकर घालणारी आपली आई ही असते आपली पहिली मैत्रीण.तसेच आपल्याला चिडवणारी,आपल्यावर रुसणारी,आपले गुपितं शेअर करणारी,दादू सर्वकाही ठीक होईल,नको काळजी करु असे बोलणारी,प्रसंगी आपल्यासाठी भांडणारी आपली लाडकी बहीण हीसुध्दा जिवाभावाची मैत्रीणच.

किशोरवयात प्रत्येक मुलाला वाटत असते की आपल्यालासुध्दा एक मैत्रीण असावी.जिच्यासोबत आपल्या मनातली प्रत्येक गोष्ट शेअर करावी.कारण हे वयच असं असतं.पण हल्ली मुलं-मुली एक गोष्ट विसरतात.फोनवर तासनतास बोलणे म्हणजे मैत्री नव्हे.मी तुला कित्ती मिस्स केले(ते फक्त तिलाच माहित..असो)मी तुला कित्ती मिस्स कॉल दिले,किती एस एम एस आले गेले म्हणजे मैत्री नव्हे.तू आज कित्ती छान दिसतेस असे खोटे बोलणारा त्या मुलीचा मित्र नव्हे आणि आपल्या टवाळक्या करणाऱ्या मित्राची बाजू घेणारी त्या मुलाची खरी मैत्रीण नव्हे. मैत्रीण ही बाईकवर बसवून फिरवण्यासाठी नसते.ती असते पानावरच्या दवबिंदूप्रमाणे हळुवार जपण्यासाठी.

तिला लागलं की मला दुखलं पाहिजे.मला दुखले की तिला कळले पाहिजे.नुसतं गोड गोड बोलणं म्हणजे मैत्री नव्हे.प्रसंगी ४ शब्दं ऐकवणे आणि चूक असतांना ऐकून घेणे ही खरी मैत्री.पण हल्ली खरे सांगितले की तिथेच नाते तुटते आणि जे असे तुटते ते खरंच नाते असते ? विवाहित स्त्री पुरुषांची मैत्री असावी की नसावी ? हा असाच एक प्रश्न.पण ९०% पुरुषांना आपल्या बायकोची मैत्री कोणा परपुरुषाशी असलेली आवडत नाही.मग अशा पुरुषांना लग्नानंतर परस्त्रीशी मैत्री करण्याचा अधिकार उरतो का ? असो.विषयाची व्याप्ती खुप मोठी आहे आणि इथे आज लिहण्यासाठी जागा कमी.त्यामुळे विषय आटोपता घेतो.





मी देवाचा अत्यंत ऋणी आहे कारण मला खुप चांगल्या मैत्रिणी मिळाल्या.माझी सर्व बकबक ऐकून घेणारी माझी बहीण सुप्रिया.वैदू,विजया,धनू..माझ्या सर्व लाडक्या बहिणी.माझ्या मैत्रिणी सीमा,रेवा आणि माझ्याशी हक्काने भांडून आता न बोलणाऱ्या,गाल फुगवून बसलेल्या पल्लवी,निशा.

जिच्याबद्दल दरवेळी लिहायचे राहून जाते ती म्हणजे नेटाक्षरीची संपादक स्वप्ना कोल्हे. ती एक उत्तम कवयित्री आहे.मला तिचा अभिमान आहे.कारण, मैत्री कशी जपतात हे फक्त तिच्याकडून शिकावे.३ वर्षांपूर्वी ऑर्कुटवरील कवितांच्या माध्यमातून आमची ओळख झाली.ऑर्कुट,ईमेल शिवाय संपर्क नाही.ना कधी मी तिला पाहिलेय.तरी आमची मैत्री टिकून आहे आणि तिने ती जपलीय.यालाच मी निखळ मैत्री म्हणतो.नुकताच तिला २००९ सालचा कुसुमाग्रज प्रतिष्ठानचा साहित्यभूषण पुरस्कार मिळाला.त्यामुळे मी तिच्या कर्तृत्वाला आणि मैत्रीला सलाम करतो.धन्यवाद मैत्रिणींनो..हा अंक निखळ मैत्रीला आणि सर्व मैत्रिणींना समर्पित.आजसाठी एवढेच.चूकभुल द्यावी घ्यावी.तुमचा मित्र प्रशांत रेडकर.

## - अतिथी संपादकाची ओळख -

मी प्रशांत दामोदर रेडकर.मी मुंबई विद्यापिठातून B.E.(Elctronics Engineer) केलेले आहे. Computer Hardware,Software,Networking चे रीतसर प्रशिक्षण घेतलेले आहे.IT आणि Management क्षेत्रांतल्या १४ पेक्षा जास्त परीक्षांत मी उत्तीर्ण आहे.



मी व्यवसायाने अभियंता पण मनाने कवी आहे.मनात जे असते ते सहज कागदावर उमटते.कोणी त्याला कविता म्हणतं तर कोणी लेख.माझे 'मनात माझ्या' व 'स्पर्श नवा' असे २ चारोळीसंग्रह प्रकाशित झालेले आहेत.'मनात माझ्या' हा चारोळीसंग्रह २० व्या वर्षी तर 'स्पर्श नवा' हा २१ व्या वर्षी प्रकाशित झालाय.सुप्रसिध्द गायक सुबोध साठे यांनी त्यांच्या 'अजूनही कळेचना' या अल्बम मध्ये माझी एक कविता स्वतःच्या आवाजात स्वरबध्द केलेली आहे.

'भांडूपचे सप्तरंग' या अनियतकालिकाचे सहसंपादक,उपसंपादक पद मी वयाच्या १२ व्या वर्षी भूषविले होते.महाविद्यालयीन निबंधस्पर्धांत मला अनेक पारितोषिके मिळाली आहेत.सामाजिक कार्यात देखील माझा उत्स्फूर्त सहभाग असतो.सिध्दिविनायक कॉम्प्युटर्सची मी वयाच्या २० व्या वर्षी स्थापना केली. 'मन,मनाचे सिध्दांत आणि कार्यपध्दती' ह्या विषयावर माझे संशोधन सुरु आहे.आत्तापर्यंत मी कविता,लेख,लघुकथा,टेक्नॉलोजी ह्यावर मराठी तसेच इंग्रजी भाषेत ब्लॉग लिहले आहेत.

### माझे आगामी साहित्य –

आरंभ आणि अंत - कादंबरी
सोबत , सुखांत - २ कविता संग्रह

# मैत्री....एका मुलाची आणि एका मुलीची

## * मैत्रिणीचं माझ्या काय काय सांगू *

मैत्रिणीचं माझ्या काय काय सांगू ?
तिखट आहे की दूधाची साय सांगू

वसंतासम सोनेरी रुप सजलेलं सांगू
अस्मानी डोळयांत स्वप्न भिजलेलं सांगू

तिचं रुसणं,हळूच गालात हसणं सांगू
वेडं वेडेपण सांगू की कोवळेपण सांगू

अल्लडपणाचा तिच्या काय कहर सांगू
की आईसारखी मायेची करडी नजर सांगू

इवल्याशा गोष्टींनी ओलावणारे डोळे सांगू
भरल्या डोळयांनी हसणारे ध्यान खुळे सांगू

आमच्या यारीदोस्तीला नसलेली हद्द सांगू
सहज राखली जाणारी एक सरहद्द सांगू

अखंड गप्पांमध्ये क्षण किती हरवलेले सांगू
तिजमुळे अबोल माझे शब्दं खुललेले सांगू

सगळयाहून न्यारी पण गोड तिची रीत सांगू
असा नमुना लाखात एकच,हे गुपित सांगू

- **अभिजीत गलगलीकर,पुणे**



# * मैत्रीण *

मित्रांनो,तिची नेहमी तक्रार असते
मी म्हणे कधी बोलत नाही
आणि तिच्यापुढे माझं मन
मी कधी खोलत नाही
तिला कितीही म्हणालो
तुझ्याशिवाय माझं चालत नाही
तिला वाटतं मस्करी करतो
मग तिही माझ्याशी बोलत नाही
आणि असं मुकं मुकं
आमचं नातं वाढत नाही
का जाणे कुणास ठाऊक
माझं प्रेम तिला दिसत नाही
नशीबाने तिचा अबोला
फार काळ टिकत नाही
बोलायला लागली की
शब्दांना मुकत नाही
मान्य आहे नसतील कळत
तिला माझ्या कविता
माझी काळजी करणारी नजर
तिला कशी कळत नाही
मैत्रीण गमवायची नाही
म्हणून मी बोलत नाही
मनात तीच असते नेहमी
म्हणून तेही कधी खोलत नाही

- आनंद माने,सोलापूर



# * माझी ऑर्कुट मैत्रीण *

अशी माझी एखादी ऑर्कुट मैत्रीण असावी
जिचे दर दिवशी दहा तरी
फॉरवर्डेड ईमेल्स यावेत
आणि दुबळ्या माझ्या ईनबॉक्समध्ये जंक मेल्स भरगच्च भरावेत

अशी माझी एखादी ऑर्कुट मैत्रीण असावी
जिचे दिवसाला दहा तरी
फक्त हाय,हाऊ आर यू असे स्क्रॅप्स यावेत
आणि सकाळी क्षेमकुशल ऐकूनही पुन्हा दुपारी हाय,हाऊ आर यू असेच विचारावे

अशी माझी एखादी ऑर्कुट मैत्रीण असावी
जिने दर दिवशी तिच्या आणि मित्रांच्याही
कम्युनिटी जॉईन करायची विनंती करावी
आणि कधी माझी कम्युनिटी जॉईन करायची मलाच रिक्वेस्ट पाठवावी

अशी माझी एखादी ऑर्कुट मैत्रीण असावी
जी दिवसातून दहा वेळा तरी
चॅटींगसाठी ऑनलाईन असावी
आणि काल बोललेल्या संभाषणाची पुन्हा तीच टेप लावावी

असा माझा एखादा ऑर्कुट कवी मित्र असावा
ज्याचे दिवसातून दोन तरी
स्वतःच्या कवितेचे लिंक्स यावेत
आणि त्याच्याच दोन नाहीत तर इतरांच्याही चार कविता वाचायला मिळाव्यात

- सुरेश शिरोडकर,मुंबई

## * आहे एक वेडी मुलगी *

आहे एक वेडी मुलगी,कसं सांगू तिला
सारखी विचारत असते,गर्लफ्रेंड आहे का तुला

आहे ती सुंदर,दिसते ती मस्त
माहित नाही फक्त मित्र समजते मला की त्यापेक्षा जास्त

तिला सांगण्याचा करतो मी नेहमी विचार
पण जमत नाही आपल्याला मात्र तसले व्यवहार

माहित आहे तिला,आहे मी खुप शाय
एवढे समजूनही ती स्वतःच का नाही करत ट्राय

नाही म्हणाली तरी चालेल,समजू शकतो मी तेवढं
आयुष्यभर फक्त मैत्रीण राहा सांगायचं आहे तुला एवढं

**- सुरज रणजीतसिंह भैसडे,पुणे**

## * अशीही माझी एक मैत्रीण असावी *

अशीही माझी एक मैत्रीण असावी
एक दोन भेटीतच मनात घर करून बसावी
रितं रितं मन सारं आनंदाचं गोकुळ होईल
घराचा ताबा म्हणून मीही कोऱ्या स्टँपवर सह्या देईल
इत्यंभुत सर्व फॉर्मलिटीज कंप्लीट करावी
प्रेमानं तिनं ही पहिली अट ऐकावी
घरात तिच्या जागा नाही मला म्हणून थोडं थोडकं मीही कधी रागवेन
कराराने नाही पण भाडे तत्वावर तरी जागा मागेन
दर महिन्याला भाडेपट्टी मात्र वसूल करावी
प्रेमानं तिनं ही दूसरी अट ऐकावी
घर मोठं असलं तरी छोट्याशा कोपऱ्यातही मी मावेन
सतत सुवास दरवळावा म्हणून बगिच्यात जाई जुई
केवडा अन निशिगंधही लावेन
या साऱ्या फुलांनी घरात प्रसन्नता ठेवावी
प्रेमानं तिनं ही तिसरी अट ऐकावी
घराचा ताबा मी मागणार नाही
याची तिला अजिबात काळजी नसावी
काळजीमुक्त राहूनी नेहमी गोड गोड हसावी
उगाच दुःखाची रडगाणी कधी गाणार नाही
प्रेमानं तिनं ही चौथी अट ऐकावी
मरणोपरांत अंत्ययात्रा माझी तिने घरूनच काढावी
अंगणातल्या बगिच्यातलीच फुले चितेवर चढवावी
फार त्रास न घेता दोन चार अश्रूंच ती रडावी
प्रेमानं तिनं ही पाचवी अट ऐकावी
अशीही माझी एक मैत्रीण असावी
एक दोन भेटीतच मनात घर करून बसावी



**- मनोज जोशी,धुळे**

## * माझी मैत्रीण *

एक वेडी मैत्रीण
आहे बरं का माझी
नेहमीच करत बसते
दुसऱ्यांचीच काळजी
थोडीशी आहे अल्लड
थोडीशी नाजूक परी
प्रेमळही आहे खुप
जणू श्रावणातली सरी
स्वतःच्याच धुंदीत रमणारी
असते स्वतःच्याच स्वप्नात
आवडतं तिला राहायला
तिच्या गोड बालपणात
पाणीपुरी खायला जाते
अन येते शेवपुरी खाऊन
निघते घरातून क्लासला
अन येते पिक्चर पाहून
मनात तिच्या नेहमी
चालूच असतं काही
वरुन वरुन असली शांत
तरी मनात खळबळ राही
देवा तिला नेहमी
सुखातच ठेवशील ना
जन्मोजन्मी तिला माझीच
मैत्रीण म्हणून पाठवशील ना !

- सागर जाधव,मुंबई

## * माझ्या मैत्रिणी *

हक्काने भांडणाऱ्या
अन पटकन रुसणाऱ्या
जीवनाच्या वाळवंटामध्ये
ओऍसिस सारख्या भासणाऱ्या
    प्रत्येक प्रॉब्लेमवरती यांच्याकडे
    हमखास सोल्युशन असते
    बोलतांना या दमत कशा नाहीत
    असे कधी कधी वाटते
जरा काही बोललो की
यांचे फुगतात गाल
सुरु होतो अबोला
अन नाक होते लाल
    सॉरी बोलून सुध्दा
    मग काहीच फायदा नसतो
    माझ्यावरचा राग सारा
    बिचाऱ्या मोबाईलवर निघतो
छोट्या छोट्या गोष्टींवर
या करतात भरपूर त्रागा
मी बिचारा करणार काय ?
बोलायला उरत नाही जागा
    सरतेशेवटी मलाच मग
    हार मानावी लागते
    माझे बंड पडते थंड अन
    मैत्रीण माझी हळूच हसते

**- प्रशांत दा.रेडकर,मुंबई**



# * योग्य 'ती' *

प्रत्येक मुलाला वाटतं..आपल्याला असावी एक मैत्रीण
सोबत तिच्या निघून जाईल दिवसभराचा क्षीण
फिरतांना हातात हात डोक्याला डोकं असेल
आयुष्य म्हणजे देवाचं वरदानच भासेल
फोन कायमचा कानापासून सुटणार नाही
बोलून बोलून घशाला कोरड पडणार नाही
आईसक्रिम कधी चॉकलेट कधी मस्तानी होईल
सुपर फ्लॉप सिनेमाही सुपरहिट वाटून जाईल
विचार केल्यावर साऱ्या गोष्टी स्वप्नवत वाटतात
मैत्रीण म्हणजे आपल्याला स्वप्नसुंदरीच वाटतात
पण चुकीच्या निवडी बऱ्याचदा घात करून जातात
सोन्यासारखे आयुष्य बरबाद करून जातात
मजा करायला ती आपल्याबरोबर फिरते
आवडी ती साऱ्या फुकटात पूर्ण करते
फालतू विषय तिचे उगीचच ऐकावे लागतात
पैशासाठी घरून जोडे खावे लागतात
शंभर रुपये काय हजार रुपये पुरत नाही
काही केल्या तिच्या आवडी संपत नाही
म्हणून उगीचच अतिघाई करु नका
कोणालाही खेटायाचा प्रयत्न करु नका
वाट पहा योग्य 'ती' नक्कीच तुम्हाला भेटेन
जी तुमच्यावर सारा जीव उतरून टाकेन
वेळेला तुमच्या तिच्याकडे किंमत असेल
भेटीची तिच्या एक वेगळी गंमत असेल
डोळे तिचे आपल्या दुःखात पाणावतील
आनंद तिच्या डोळयात सारे जाणवतील
डोळे उघडा मग सापडेन 'ती' तुमच्या साठीच बनलेली
वेगात चालेल गाडी आयुष्याची,एक बाजूला कललेली



**- शैनाथ कळमकर,पुणे**

## * सख्खी *

भरकटले कधी गलबत माझे
शीडात अवखळ उधाण वारा
अशा क्षणी तू आई बनलीस
दाखविला ध्रुवाचा तारा

भय धडधडले छातीपाशी
उदासवाणी संध्याकाळ
सावरशी बोटाला धरुनी
बहीण बनूनी होशी ढाल

खडबडीत या खडकाला तू
रातराणीचा देशी गंध
भार्या बनूनी उटणे चोळीशी
सुखांस ना कुठला निर्बंध

झंझावाती वर्षे थकता
कन्या बनूनी डाव मांडिशी
नवे बालपण धुसमुसळेसे
हट्टाने अंगात सांडिशी

तुझ्याविणा मी पूर्ण अधुरा
जसा कुंद वठलेला वृक्ष
चव जगण्याची दिलीस सखये
तुजविण अळणी बेचव रुक्ष

आजी,मामी,काकी,सासू
भाची,पुतणी,मैत्रीण,नात
रुपे सुखांची ईश्वर नश्वर
तूच मनाला सख्खी साथ

**- नाम गुम जायेगा,ठाणे**



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा
ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५0000 मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.
त्या व्यतिरिक्त संकेतस्थळावर व्हिजिट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.
हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा
आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

– ई साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामुल्य ई साप्ताहिके –
स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम , बाल नेटाक्षरी , ई श्टाप
आणि
– प्रसिध्द झालेली ई बुक्स –
टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण, तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान, ई शाळा , तो , ती आणि सिगरेट




हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com